श्रीमती शुभांगी भोस्तेकर यांनी जसलोक हॉस्पिटल व रिसर्च सेंटर व इतर ५ यांच्या विरोधात केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोगाच्या शिफरशींनुसार गर्भसंगोपनासाठी (Surrogacy) कार्यप्रणाली निश्चीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१८/२९८/प्र. क्र.२८९/ कु.क.**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: ०२ जुलै, २०१८

**वाचा -**

**१. अवर सचिव तथा प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग यांचे दिनांक ०६.०४.२०१८ चे पत्र.**

**प्रस्तावना -**

श्रीमती शुभांगी भोस्तेकर यांनी महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग मुंबई यांचेकडे दाखल केलेल्या तक्रारी संदर्भातील प्रकरण क्र. ९२/१७-१८ बाबत दिनांक २२ मार्च, २०१८ रोजी आयोगाने पारीत केलेल्या शिफारशींनुसार या प्रकरणाचा सखोल अभ्यास करुन शासनास गर्भसंगोपनाची (surrogacy) कार्यप्रणाली निश्चित करण्यासाठी समिती गठित करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

श्रीमती शुभांगी भोस्तेकर यांनी श्री.प्रकाश भोस्तेकर व इतर पाच यांच्या विरुध्द महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग मुंबई यांचेकडे तक्रार दाखल केली होती. बालकांचे हक्क सरंक्षित करण्याच्या दृष्टीकोणातून आयोगाने सदर प्रकरणी क्र. ९२/२०१७-१८ संदर्भात दिनांक २२ मार्च, २०१८ रोजी पारित केलेल्या सर्वसमावेशक आदेशातील शिफारशींचा अभ्यास करुन राज्यात गर्भसंगोपन (surrogacy) बाबत अनुसरावयाची कार्यपध्दती निश्चित करण्यासाठी शासनाला शिफारस करण्यासाठी पुढील प्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

१) श्रीमती वंदना कृष्णा, अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग - अध्यक्ष
२) डॉ.दिपाली काळे, एसीपी सोलापूर - सदस्य (वरिष्ठ महिला अधिकारी)
३) डॉ.रेखा डावर, सेवानिवृत्त अधिष्ठाता-सदस्य
४) डॉ. संजय गुप्ते, पुणे-विषयतज्ञ सदस्य
५) डॉ.साधना पटवर्धन नागपुर- विषयतज्ञ सदस्य
६) डॉ.अनुजा गुलाटी,राज्य समन्वयक, युएनएफपीए, मुंबई-सदस्य
७) अतिरीक्त संचालक आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण)-सदस्य सचिव

२. **समितीची कार्यकक्षा :-**

१) समितीने श्रीमती शुंभागी भोस्तेकर यांनी केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने सविस्तर माहिती घेऊन या प्रकरणांचा अभ्यास करावा.
२) केंद्र शासनाने संसदेत सादर केलेल्या गर्भसंगोपन नियंत्रण विधेयकाचा (Regulation of surrogacy bill 2016) अभ्यास करुन सदर विधेयक अंतिम होऊन केंद्र शासनाच्या अंमलबजावणीबाबतच्या सुचना प्राप्त होईपर्यंत राज्यामध्ये त्यासंदर्भात अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत शिफारशी करणे.
३) भारतीय वैद्यकीय संशोधन परिषदेने (Indian Council of Medical Research) सहाय्यित प्रजनन तंत्रज्ञान (Assisted Reproductive Technology) संदर्भातील मार्गदर्शक सूचनांचा अभ्यास करुन त्याची राज्यामध्ये अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने मार्गदर्शक तत्वे निश्चीत करणे.
४) राज्यामध्ये Assisted Reproductive Technology केंद्रांची नोंदणी / परवाना तसेच सरोगेट माता, बालके यांची निगा व देखभाल यासाठी मार्गदर्शक तत्वे बनविणे.
५) सरोगेट माता व त्यांचे जोडीदार (Spouse), बीज व शुक्राणु दाते (Donor) यांची Assisted Reproductive Technology केंद्रामध्ये/ दवाखान्यामध्ये नोंदणी करण्याची कार्यप्रणाली ठरविणे.
६) विभागीय स्तरावर तक्रार निवारण कक्ष (Grievance cell) तयार करणे.

सदर समिती प्रस्तुत शासन निर्णय पारित झाल्यापासून तीन महिन्याच्या कालावधीत शासनाला अहवाल सादर करेल.

समितीच्या सदस्यांना शासकीय नियमानुसार प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. यासाठीच्या खर्चाची प्रतिपुर्ती पीसीपीएनडीटी कायद्यांतर्गत नोंदणी शुल्काच्या राज्य स्तरावरील उपलब्ध निधीमधून अतिरीक्त संचालक आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण) यांच्या स्तरावरून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२२११५५२४९३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ujwala Arun Ransing

Digitally signed by Ujwala Arun Ransing
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7788b3b31e2d9269bcbfd9588a6ee4771341780133d295a56dd4ef476977773, serialNumber=3b8f98f1c182bf458a4deee399a7241b5044aeb09c097bc6d28b58709fe8ef0d, cn=Ujwala Arun Ransing
Date: 2018.07.02 11:22:36 +05'30'

**(उज्वला अ.रणसिंग)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (आरोग्य व कु.क.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री (आरोग्य व कु.क.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, सा.आ.वि.मंत्रालय, मुंबई
७. सचिव (महिला व बाल विकास विभाग), मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई.
९. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१०. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
११. समिती सदस्य (सर्व)
१२.निवडनस्ती